**मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठ मुळ अर्ज क्र.५४२/२००२ मध्ये, दिनांक ७.२.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणेबाबत..**
**श्री. कैलास भिमराव गवळी**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एस-३०/२०१३/प्र.क्र. ३६/फ-९**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :-११ फेब्रुवारी, २०१५**

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-२००१/प्र.क्र. २७/ २००१/ १२, दिनांक २०.१०.२००५

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मानव संसाधन,व्यवस्थापन व प्रशासन), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-७/आस्था-३/प्र.क्र.६५ व ६६/०२-०३/१५९/१४-१५, दि २६.१२.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना** :-

श्री. कैलास भिमराव गवळी यांनी शासन निर्णय दिनांक ३१.१.१९९६ नुसार अधिसंख्य वनमजूर या पदावर कायम न केल्यामुळे त्यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे दाखल केलेला मुळ अर्ज क्रमांक ५४२/२०१२ मध्ये दिनांक ७.२.२०१२ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये शासनाच्या विरुध्द निर्णय लागला. सदर, दिनांक ७.२.२०१२ च्या निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद येथे रिट याचिका दाखल करण्याच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिलेली नाही. त्यामुळे, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्या दिनांक ७.२.२०१२ च्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याकरीता, श्री. गवळी यांचे करिता दिनांक १.११.१९९४ पासून एक अधिसंख्य वनमजूराचे पद निर्माण करून, त्यांना देय असलेल्या थकबाकीची रक्कम अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री.कैलास भिमराव गवळी हे दिनांक २०.६.१९८६ पासून वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय, जालना येथे रोजंदारी मजूर म्हणून कार्यरत होते. त्यांना शासन निर्णय दिनांक ३१.१.१९९६ नुसार अधिसंख्य वनमजूर या पदावर कायम न केल्यामुळे त्यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे दाखल केलेला मुळ अर्ज क्रमांक ५४२/२०१२ मध्ये दिनांक ७.२.२०१२ रोजी सुनावणी होवून, शासनाच्या विरुध्द निर्णय लागला. या प्रकरणी दिनांक ७.२.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद येथे रिट याचिका दाखल करण्याच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने मंजूरी दिलेली नाही.

सबब, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल मुळ अर्ज क्रमांक ५४२/२००२ मध्ये, दिनांक ७.२.२०१२ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी श्री. कैलास भिमराव गवळी यांच्यासाठी दिनांक १.११.१९९४ पासून १ वनमजूराचे अधिसंख्य पद निर्माण करून, त्यांना देय असलेली थकबाकीची रुपये रू.१०,९८,०४७/- (रूपये दहा लाख अठ्ठयाण्णव हजार सत्तेचाळीस मात्र) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू खर्च मागणी क्रमांक सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) वनमजुरांचे अधिसंख्य पद निर्मिती (२४०६ १८९८) या लेखा शिर्षाअंतर्गत चालू वित्तीय वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदरहू तक्रारदारास अदा करावयाची थकबाकीची रक्कम अचूक असल्याची खातरजमा मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा अनौपाचारीक संदर्भ क्र.६६/ का-१२, दिनांक २८.१.२०१५ आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५९/२०१५/व्यय-१०, दिनांक ४.२.२०१५ अन्वये त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१११७४८४४८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.11 17:57:55 +05'30'

**( डॉ.यु.एम.फारुकी )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.

६. संचालक, वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय, जालना.

७. महालेखापाल-I( लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

९. कार्यासन अधिकारी, व्यय- १०, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई

१०.कार्यासन अधिकारी, सा.प्र.वि./१२, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई

११.फ-९ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ ( निवड नस्ती)